2011031717130100१

सांगली, मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिकेमधील **"नगर रचनाकार"** पदाची अर्हता सुधारीत करण्यास मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांक: सामपा ३००६/१९३०/प्र.क्र. २५१ /नवि-२२

मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२, दिनांक: - २४ एप्रिल, २००८

वाचा :- १) आपले पत्र क्र. मनपा/आस्थावि/४१४/०३-०४ दि. ०७.०१.२००४, व त्यासोबतचा महापालिका सभा ठराव क्र. १३४ दि. ३०.०८.२००२.

२) पत्र क्र. ३६/२००५, दि. २.५.२००५.

३) पत्र क्र. मनपा/आस्थावि/१/९८७/०६-०७ दि. २८.११.२००६.

**प्रस्तावना:-**

सांगली, मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका आस्थापनेवर **"नगर रचनाकार"** पदनामाची रु. २२००-७५-२८००द.रो.-१००-३७०० या वेतनश्रेणीतील बारा पदे मंजूर आहेत. या बारा पदापैकी दोन पदे शासनाच्या नगररचना विभागातील अधिका-यांच्या प्रतिनियुक्तीसाठी आरक्षित आहेत. महापालिकेच्या आस्थापनेवर सदर पदे निर्माण करतांना त्या पदावरील अधिकारी महापालिकेने नियुक्त केलेला असावा व त्याच्यावर महापालिकेचे नियंत्रण राहावे आणि महापालिकेने ठरवून दिले त्या धोरणांची त्यांने अंमल बजावणी करावी हा प्रमुख उद्देश होता. या निर्माण झालेल्या पदांवर शासनाने प्रतिनियुक्तीवर पाठविलेले अधिकारी हे शासनाकडील नगर रचनाकार पदाच्या सेवाप्रवेश नियमानुसार डी.सी.ई. पात्रतेचे आहेत. महापालिकेमध्ये ही तांत्रिक पात्रता धारण केलेले अनुभवी अधिकारी कायम सेवेत आहेत. अशा अधिका-यांना त्या पदावर काम करण्याची संधी उपलब्ध व्हावी या दृष्टीने महासभेने ठराव क्र. १३४ दि. ३०.०८.२००२ अन्वये महापालिकेच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या नगर रचना या पदाची शैक्षणिक पात्रता बी.ई. (सिव्हील)/ बी.आर्कि. अथवा डी.सी.ई. व १० वर्षाचा ज्युनिअर इंजिनियर व शाखा अभियंता या पदाचा नगरपालिका /महापालिका मधील कामाचा अनुभव अशी सुधारीत करण्यास मंजूरी मिळण्यास तसेच सदरचे पद भरतेवेळी सरळसेवा भरतीने

अथवा यापूर्वी नगरपालिकेत/महापालिकेत विकास योजनेची कामे व नगर रचनाकार पदाची अनुषंगिक सर्व प्रकारची कामे हाताळलेल्या महानगरपालिका कर्मचा-यांमधून सेवाज्येष्ठता व पात्रतेनुसार भरण्यास आयुक्त, सांगली, मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका यांनी मान्यतेसाठी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सांगली, मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका आस्थापनेवरील **"नगर रचनाकार"** या पदाच्या शैक्षणिक अर्हतेत सुधारणा करण्यासंबंधी आयुक्तांनी प्रस्तावित केल्यानुसार खालील प्रमाणे शैक्षणिक अर्हतेत बदल करुन, सदर पदे सरळसेवेने अथवा पदोन्नतीने पात्र अधिका-यांमधून भरण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम,१९४९ च्या कलम ४५७ मधील ३ (अ) येथील तरतूदीस अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे

| **पदनाम** | **सध्याची शैक्षणिक अर्हता** | **सुधारीत शैक्षणिक अर्हता** |
|---|---|---|
| **नगर रचनाकार** | बी.ई. (सिव्हील)/ बी.आर्किटेक्ट | "बी.ई. (सिव्हील)/ बी. आर्किटेक्ट अथवा डी.सी.ई. व ज्युनि. इंजिनियर आणि शाखा अभियंता या पदाचा नगरपालिका अथवा महानगरपालिकेतील कामाचा १० वर्षाचा अनुभव |

२. सांगली, मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली यांनी प्रस्तुत प्रकरणी सर्व संविधानिक बाबींची पुर्तता करुन त्यासंबंधीचा अहवाल शासनास पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनिल कोठेकर)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त,सांगली, मिरज आणि कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली
४. संचालक, नगर रचना, पुणे
५. निवडनस्ती, नगर विकास विभाग (नवि-२१), मंत्रालय, मुंबई-३२